रिट पिटीशन ११३८४ / २०१७ (श्री. हिरालाल जाधव, अधीक्षक (निलंबित), ठाणे मध्यवर्ती कारागृह विरूध्द महाराष्ट्र शासन व इतर) या प्रकरणी ॲड. अनिल साखरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्रमॅट-०९१७/१६१/प्र.क्र.२२४ /तुरुंग-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०१८

**वाचा:** १) शासन पत्र, न्यायप्रमॅट-०९१७/१६१/प्र.क्र.२२४ /तुरुंग-१ दि.२४.११.२०१७
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:- विअप्र.-२०१५/प्र.क्र.२५/२०१५/विनियम, दिनांक २९.०७.२०१५

**प्रस्तावना :**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट पिटीशन ११३८४ / २०१७ (श्री. हिरालाल जाधव, अधीक्षक (निलंबित), ठाणे मध्यवर्ती कारागृह विरूध्द महाराष्ट्र शासन व इतर) या प्रकरणी शासनाच्या उक्त नमूद दिनांक २४.११.२०१७ रोजीच्या पत्रानव्ये ॲड. अनिल साखरे यांची शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी व शासनाची बाजू प्रभावीपणे मांडण्यासाठी विशेष अभियोक्ता म्हणुन नियुक्ती करण्यात आली होती. या प्रकरणी श्री. अनिल साखरे यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे कामकाज पाहिल्याबाबतचे शुल्क मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

ॲड. अनिल साखरे यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे या प्रकरणी कामकाज पाहिल्याबाबतचे एकूण रू. ४,८०,०००/- (अक्षरी रूपये चार लाख ऐंशी हजार फक्त ) इतक्या फीचे देयके अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या व्यतिरिक्त ॲड. अनिल साखरे यांना अन्य कोणतीही फी वा भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय अधीक्षक दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-यांकडून प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

२. यासाठी येणारा खर्च अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, पुणे या कार्यालयाच्या मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशिर्ष २०५६ तुरुंग (००१) संचालन व प्रशासन (००)(०१) कारागृह निरीक्षणालय (२०५६००२६) (२८) व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, विधि व न्याय विभागाच्या क्र. ६५९-२०१७/E, दि.१९.०७.२०१७ या पत्राच्या अनुषंगाने तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९.०७.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-दोन, अ.क्र. ४९ नियम क्रमांक १६६-"अ" नुसार प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. ॲड. अनिल साखरे यांना न्यायालयीन खर्चाची प्रतिपुर्ती करण्याबाबतची कार्यवाही अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तात्काळ करुन त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२११४५७१९७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saguna G Thengil

Digitally signed by Saguna G Thengil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc135025943cb93cc90de6ceb564ced5ea3, cn=Saguna G Thengil
Date: 2018.06.21 14:56:38 +05'30'

**( स. ग. ठेंगिल )**

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई
३) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई
४) ॲड. अनिल साखरे (द्वारा :- अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे )
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/मुंबई.
६) निवड नस्ती कार्यासन तुरुंग-१.